मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मूलभूत सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत पर्यावरणाचे ना-हरकत प्रमाणपत्र मिळण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

शासन निर्णय क्र मत्स्यवि १०९९/(१७१)/पदुम १४

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ११ मे, २००१

पहा :१) शासन ज्ञापन कृषि व पदुम विभाग क्र मत्स्यवि १०९७/३१८४७/(३४२)/पदुम १४ दिनांक ३१ मार्च,१९९८

२) शासन ज्ञापन कृषि व पदुम विभाग क्र मत्स्यवि १०९८/४७८/(३)/पदुम १४ दिनांक ६ एप्रिल,१९९८

३) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची क्र. मत्स्य (सा) ०५१४०१/८०९६, दिनांक ३० ऑगस्ट,२००० व क्र. मत्स्य/०५१४०५/१५९८ दि. २६/६/२०००ची पत्रे

**प्रस्तावना :**

कोकण विकासाच्या कालबध्द कार्यक्रमांतर्गत शासन ज्ञापन दिनांक ३१ मार्च,१९९८ नुसार एकदरा कोळीवाडा व अलिबाग कोळीवाडा, जि. रायगड तारकर्ली कोळीवाडा, जि. सिंधुदुर्ग व शासन ज्ञापन दिनांक ६ एप्रिल, १९९८ अन्वये राजपुरी कोळीवाडा, जि. रायगड, आचरा-पिरवाडी व तारामुंब्री जि. सिंधुदुर्ग या सहा ठिकाणी जेट्टी, प्रसाधनगृह आणि मासळी सुकविण्यासाठी प्लॅटफॉर्म बांधणे या कामासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. सदर कामांना प्रशासकीय मान्यता देताना केंद्र शासनाने त्यांच्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या आदेशामध्ये या सर्व कामांना पर्यावरण ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची अट घातलेली आहे. या संदर्भात केंद्र शासनाच्या अंगिकृत नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ ओशनोग्राफी या संस्थेकडे विचारणा केली असता सदर संस्थेने उपरोक्त ६ ठिकाणी पर्यावरण विषयक अभ्यासासाठी सल्ला फी रु. २२.५० लक्ष अधिक बोटभाडयासाठी रु. ४.०० लक्ष असे एकुण रु. २६.५० लाखांचा सल्लाशुल्काचा प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर सेवाशुल्कास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आता एकदरा कोळीवाडा, अलिबाग कोळीवाडा व राजपुरी कोळीवाडा, जि. रायगड, तारकर्ली कोळीवाडा, जि. रायगड, आचरा-पिरवाडी व तारामुंब्री जि. सिंधुदुर्ग या सहा ठिकाणी जेट्टी, प्रसाधनगृह आणि मासळी सुकविण्यासाठी प्लॅटफॉर्म बांधणे या कामासाठी पर्यावरण ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याच्यादृष्टीने पर्यावरण विषयक अभ्यासासाठी भारत सरकार अंगिकृत नॅशनल इन्स्टीटयूट ऑफ ओशनोग्राफी यानी सादर केलेल्या रु. २६.५० लाखांच्या सल्लाशुल्काच्या प्रस्तावास शासनाची प्रशासकीय

GR-20020122125328000-0400-

मान्यता देण्यात येत आहे. सदर सल्लाशुल्कापैकी ५० टक्के रक्कम ही संस्थेस कार्यादेश देण्यापूर्वी, २५ टक्के रक्कम प्रत्यक्ष जागेची पहाणी केल्यानंतर व उर्वरित रु. २५ टक्के रक्कम अंतिम अहवाल देण्यापूर्वी अदा करण्यात यावी.

यासाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत तरतूद उपलब्ध झाल्यानंतर भागविण्यात यावा.

मागणी क्र. डी-१४,

४४०५ मत्स्यव्यवसायावरील भांडवली खर्च,

१०३ सागरी मत्स्यव्यवसाय

१०३ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,

१०३(दोन)(दोन) लहान मासेमारी बंदरे

(ए) राज्य योजनांतर्गत योजना (४४०५ ००४१)

हे आदेश नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. प्रक्र १०२/व्यय १ दिनांक ५ मार्च,२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सो. [signature]

(सुजाता दि. ढोले)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई

उपसंचालक मत्स्यव्यवसाय (सागरी), आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई

प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, मुंबई

सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक, रायगड/सिंधुदुर्ग

महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखाधिकारी, मुंबई,

जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी

नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

कक्ष अधिकारी (पदुम १६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

निवडनस्ती

GR - 20020122125328000 - 0400.